**समतानगर पोलीस ठाणे, मुंबई येथील गु.र.क्र.२०/२०१८ या गुन्हे प्रकरणामधून उदभवणाऱ्या सर्व न्यायप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल न्यायालयीन प्रकरणात विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. राजा ठाकरे यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी ०५१८/प्र.क्र.१६७/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १९ ऑक्टोबर, २०२०

<u>संदर्भ</u> :- (१) विधी व न्याय विभाग, शासन आदेश क्र.११/१४४/क्राईम.जन/१८/"अ" शाखा. दिनांक २१ जानेवारी, २०१९
(२) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक २९ जुलै, २०१५.
(३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक १६ जून, २०१७.

<u>प्रस्तावना :-</u>

समतानगर पोलीस ठाणे, मुंबई येथील गु.र.क्र.२०/२०१८ या गुन्हे प्रकरणामधून उदभवणाऱ्या सर्व न्यायप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल न्यायालयीन प्रकरणात विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून ॲड. श्री. राजा ठाकरे यांची संदर्भ क्र. १ वरील विधी व न्याय विभागाच्या दिनांक २१.०१.२०१९ च्या शासन आदेशान्वये नियुक्ती करण्यात आली आहे. मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे शासनाच्यावतीने न्यायालयीन कामकाज हाताळणा-या ॲड. श्री. राजा ठाकरे यांना व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासन विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे समतानगर पोलीस ठाणे, मुंबई येथील गु.र.क्र.२०/२०१८ या गुन्हे प्रकरणामधून उदभवणाऱ्या सर्व न्यायालयीन प्रकरणात ॲड. श्री. राजा ठाकरे यांची विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यास विधि व न्याय विभागाने मंजुरी दिली आहे. ॲड. श्री. राजा ठाकरे यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी प्रदान करण्यास शासन मान्यता देत आहे.

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी ... रू. २५,०००/- (रुपये पंचवीस हजार फक्त)
ब) विचारविनिमय फी (प्रति तास) ... रू. १५,०००/- (रुपये पंधरा हजार फक्त)
क) (कमाल मर्यादा प्रतिदिन ... रु ५०,०००/- (रुपये पन्नास हजार फक्त))

२. ॲड. श्री. राजा ठाकरे यांना अनुज्ञेय असलेल्या व्यावसायिक फीचे प्रदान नियमित न्यायालयीन कामकाजानंतर करण्यात यावे. न्यायालयीन कामकाजाचे परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत

प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान ॲड. श्री. राजा ठाकरे यांना होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस उपायुक्तांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०८), राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र:- विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/ विनियम, दिनांक २९.०७. २०१५ तसेच दिनांक १६/०६/२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०१९१७२४३९२७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.10.19 17:27:57 +05'30'

**( किशोर भालेराव )**
**उप सचिव (विधि), गृह विभाग**

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस सह आयुक्त, परिमंडळ-१२, मुंबई
३. पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-१२, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ , मुंबई .
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. ॲड.श्री.राजा ठाकरे, ३०९, मारुती मेन्शन, १७ रघुनाथ दादाजी मार्ग, फोर्ट, मुंबई-४००० ०१.
८. विधी व न्याय विभाग (अ शाखा), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).